जिल्हा आरोग्य प्रयोगशाळा नांदेड येथील कार्यालयाच्या इमारतीमधील विविध कामास प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्धतेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१६/ प्र.क्र.९१/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ६ फेब्रुवारी, २०१७.

वाचा

**१) सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/ कक्ष-३/ टे-६/जिआप्रनांदेडइमाकाम/१३४७०-७१/१६, दि.१९.०८.२०१६.**

प्रस्तावना

संदर्भाधीन पत्रान्वये जिल्हा आरोग्य प्रयोगशाळा, नांदेड येथील प्रयोगशाळेकरीता गुरुगोविंदसिंघजी स्मृती रुग्णालय, नांदेड या परिसरातील इमारतीमध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या जागेच्या प्रयोगशाळेचे कामकाज सुरु करण्यासाठी टाइल्स, पार्टीशन, ॲल्युमिनियम दरवाजे, खिडक्या, रंगरंगोटी, सेप्टिक टॅकचे बांधकाम, कडाप्पा, ग्रॅनाईट व ओटा इत्यादी कामासाठी एकूण ६ अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड यांनी सन २०१५-१६ च्या दरसुचिवर तयार केलेले रु.१७,००,९००/- इतक्या किंमतीचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता व निधी मिळणेबाबतच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये जिल्हा आरोग्य प्रयोगशाळा, नांदेड येथील प्रयोगशाळेकरीता गुरुगोविंदसिंघजी स्मृती रुग्णालय, नांदेड या परिसरातील इमारतीमध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या जागेच्या प्रयोगशाळेचे कामकाज सुरु करण्यासाठी विविध कामाच्या अंदाजपत्रकास खालीलप्रमाणे सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात होणाऱ्या रु.१७,००,९००/- इतक्या किंमतीचे एकूण ६ अंदाजपत्रकाच्या खर्चास प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजे रक्कम रु. |
|---|---|---|
| १. | टाईल्स व इतर कामकाज | २,५९,४००/- |
| २. | प्रयोगशाळा खोली / रुमसाठी पार्टीशन करणे | २,८३,७००/- |
| ३. | ॲल्युमिनियम दरवाजे व खिडक्या | २,८८,६००/- |
| ४. | कार्यालय पार्टीशन करणे | २,७९,२००/- |
| ५. | रंगरंगोटी व सेप्टीक टॅकचे बांधकाम करणे | २,९९,३००/- |

| | | |
|---|---|---|
| ६. | कडप्पा व ग्रॅनाईट ओटा, सिंक व पाण्याच्या टाक्या बसविणे | २,९०,७००/- |
| | **एकूण** | **१७,००,९००/-** |

सदर बांधकामाकरीता आवश्यक असलेला निधी खालील लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक एच-८**

"४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)
११०- रुग्णालये व दवाखने
(१)(अ)- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-इमारती
(००)(०१)- मोठी बांधकामे ( ४२१० ००१४)
५३- मोठी बांधकामे

सदर अंदाजपत्रके रु.२० लक्षपेक्षा कमी रकमेची असल्याने वित्त विभागाच्या वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंर्भात निर्गमित करण्यात आलेल्या शा.नि.क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम भाग-२, दि.१७.०४.२०१५ च्या शासन निर्णयातील भाग एक उपविभाग-५ अ.क्र.३ व सार्वजनिक बांधकाम विभाग नियतपुस्तिकेतील परि. क्र.१३४ नुसार किरकोळ नागरी बांधकामांना रु.२० लाख रकमेपर्यतच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०२०६१३०४३४३४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87cfab3c12a61b33987277f837a341fb6c84ebe6d1bf10339d150649af95e5b8, cn=Ashok Tanbaji Uike
Date: 2017.02.06 15:29:26 +05'30'

**अ.ता.उईके**
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.

२. सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई /पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, नांदेड
८. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
९. विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११.अवर सचिव (आरोग्य-४ ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२.निवडनस्ती ( आरोग्य-४ ).